**स्वातंत्र्यवीर सावरकर घराण्यातील बाई, माई आणि ताई सावरकर या महिलांचा त्याग,समर्पण आणि स्वातंत्र्यवीर सावरकर यांची स्वराज्य निर्मितीतील भूमिका यावर आधारित “त्रिवेणी” या नाट्यप्रयोगाच्या आयोजन खर्चास वित्तीय मान्यता देणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग**
**शासन निर्णय क्र. संकीर्ण ८२२३ /प्र.क्र.४४२/सां.का.४**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दिनांक : २७ जुलै, २०२३

**वाचा :-** १. शासन निर्णय, पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, क्र.संकीर्ण ८२२३/प्र.क्र.४४२/सां.का.४, दिनांक २३ जून, २०२३.
२. सांस्कृतिक कार्य संचालनालय यांचे पत्र क्र.सांकासं/४१४६, दिनांक २४ जुलै, २०२३.

**प्रस्तावना :-**

भारतभूमीला स्वातंत्र्य मिळवून देण्यामध्ये तसेच देशासाठी प्राणाची आहूती देणारे असंख्य क्रांतीकारक घडविण्यामध्ये स्वातंत्र्यवीर सावरकरांचे मोलाचे योगदान आहे. त्याच बरोबर सावरकर बंधु तुरुंगवासात असताना त्यांच्या सहचरणी सावरकर घराण्यातील बाई, माई आणि ताई या तिघींनी भारतमातेच्या मुक्ततेसाठी राष्ट्रकार्याची मशाल धगधगती ठेवली. या तिघींनी केलेला त्याग, त्यांचे समर्पण व स्वातंत्र्यवीर सावरकर यांची स्वराज्य निर्मितीतील भूमिका यावर आधारित “त्रिवेणी” या नाट्यप्रयोगाचे सादरीकरण सांस्कृतिक कार्य संचालनालय आणि अनुनाद कलाविष्कार बहुउद्देशीय संस्था व संवेदना संस्था, नागपूर यांचे संयुक्त विद्यमाने दिनांक २६ जून, २०२३ रोजी नागपूर येथे आयोजित करण्यात आला होता.

उपर्निर्दिष्ट १ च्या शासन निर्णयान्वये सदर नाट्यप्रयोग आयोजनास प्रशासकीय मान्यता देण्यात आली होती. तरी, आता “त्रिवेणी” या नाट्यप्रयोग आयोजनाकरीता झालेल्या खर्चास वित्तीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

सांस्कृतिक कार्य संचालनालय आणि अनुनाद कलाविष्कार बहुउद्देशीय संस्था व संवेदना संस्था, नागपूर यांचे संयुक्त विद्यमाने सावरकर घराण्यातील बाई, माई आणि ताई या तिघींनी केलेला त्याग, त्यांचे समर्पण व स्वातंत्र्यवीर सावरकर यांची स्वराज्य निर्मितीतील भूमिका यावर आधारित दिनांक २६ जून, २०२३ रोजी “त्रिवेणी” या नाट्यप्रयोग सादरीकरणाकरीता आलेल्या रुपये २,२०,५००/- (अक्षरी रुपये दोन लाख वीस हजार पाचशे फक्त) इतक्या खर्चाच्या रकमेस या शासन निर्णयान्वये वित्तीय मान्यता देण्यात येत आहे.

२. सदरचा खर्च लेखाशीर्ष मागणी क्र.. झेडड-२, २२०५, कला व संस्कृती, १०२, कला व संस्कृती प्रचालन, (०२) राज्य नृत्य, नाट्य, तमाशा व संगीत महोत्सव, (०२) (०२) राज्य कला संस्कृति जतन, संवर्धन विविध महोत्सव तसेच इतर कार्यक्रम (कार्यक्रम) (२२०५ १५०७) - ५० इतर खर्च या लेखाशिर्षाखाली सन २०२३-२४ या वर्षासाठी मंजूर असलेल्या आर्थिक तरतुदीतून भागविण्यात यावा.

३. यासाठी संचालक, सांस्कृतिक कार्य संचालनालय यांना नियंत्रण अधिकारी तसेच लेखाधिकारी, सांस्कृतिक कार्य संचालनालय यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

४. सदर खर्च वित्त विभागाच्या शासन निर्णय क्र. विअप्र-२०१३/विनिमय, दिनांक १७ एप्रिल, २०१५, वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८, भाग-पहिला, उपविभाग-३, अ.क्र. ४ परिच्छेद क्र. २७ (२) (अ) अन्वये प्रशासकीय विभागास प्राप्त अधिकारानुसार मंजूर करण्यात येत आहे.

५. सदर प्रकरणी वित्त विभागाच्या शासन निर्णय क्र. अर्थसं-२०२३/ प्र.क्र.४०/ अर्थ-३, दिनांक १२ एप्रिल, २०२३ मधील सर्व परिच्छेद व परिशिष्टातील अटींनुसार कार्यवाही करण्याची जबाबदारी संचालक, सांस्कृतिक कार्य संचालनालय, मुंबई यांची राहील. तसेच, सदर कार्यक्रमाची देयके हा शासन निर्णय निर्गमित झाल्यापासून संपूर्णपणे संबधितांना अदा करण्याची कार्यवाही १५ दिवसाच्या आत करण्याची जबाबदारी संचालक, सांस्कृतिक कार्य संचालनालय, मुंबई यांची असेल.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक क्रमांक २०२३०७२७१५१४१९०२२३ असा आहे. हा शासन निर्णय डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

ANIROODHA SURYAKANT DESHPANDE

Digitally signed by ANIROODHA SURYAKANT DESHPANDE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=TOURISM AND CULTURAL AFFAIRS DEPARTMENT, 2.5.4.20=d34fa92fd12dd57b9647dbd172129b5c0eb8b1cd7ff442b98831311214458302, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=0D09B1312327B281B742D56CD04EE1899269D4FAAF88991AC3364BDCC437CF37, cn=ANIROODHA SURYAKANT DESHPANDE
Date: 2023.07.27 15:15:27 +05'30'

**( अनिरुध्द सु.देशपांडे )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा. मंत्री यांचे खाजगी (सांस्कृतिक कार्य )सचिव, मंत्रालय, मुंबई
२. प्रधान सचिव, सांस्कृतिक कार्य यांचे स्वीय सहाय्यक, पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
३. उप सचिव ( सां.का.) यांचे स्वीय सहाय्यक, पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२

४. संचालक, सांस्कृतिक कार्य संचालनालय, जुने सचिवालय इमारत, एम.जी. रोड, मुंबई ४०० ०३२
५. कार्यासन अधिकारी (अर्थसंकल्प), पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, मंत्रालय, मुंबई
६. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
७. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई,
८. महालेखापाल (लेखा परीक्षा) - १ महाराष्ट्र, मुंबई
९. महालेखापाल (लेखा परीक्षा) - २ महाराष्ट्र, नागपूर
१०. महालेखापाल (लेखा अनुज्ञेयता) - १ महाराष्ट्र, मुंबई
११. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)- २ महाराष्ट्र, नागपूर
१२. निवड नस्ती, सां.का.४.